**जनहित याचिका क्र.५७/२०१६ मध्ये मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने दि.१०.१०.२०१८ रोजी दिलेल्या आदेशानुसार राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, संचालित डॉ. बाबासाहेब आंबेडकर विधि महाविद्यालय नागपूर येथील पदे भरण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र-२०१८/प्र.क्र.२८१/१८/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २१ फेब्रुवारी, २०१९

वाचा :-

१. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. एमयुएन-२००४ (१६५/०७)/विशि-५, दि. १५ नोव्हेंबर, २००७.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.३०/२०१६/आ.पु.कक्ष, दि.२५.०५.२०१७.वित्त विभाग.
३. शासन परिपत्रक क्र. पदनि-२०१७/प्र.क्र.२०/आपुक, दि. २९ जून, २०१७.
४. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांचे जनहित याचिका क्र. ५७/२०१६ मधील दि.१०.१०.२०१८ चे आदेश.
५. प्रभारी कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर यांचे क्र. आस्था-५/१८/रिक्त पदे/६६१, दिनांक २६ ऑक्टोबर, २०१८ चे पत्र.

प्रस्तावना :-

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.०२ येथील दि.२५.०५.२०१७ च्या शासन निर्णयान्वये जोपर्यंत आकृतीबंध निश्चित होत नाहीत तोपर्यंत पद भरती, पद निर्मिती तसेच पदे रुपांतरीत करण्यास निर्बंध आहेत. त्यानुसार राज्यातील अकृषि विद्यापीठामधील शिक्षक व शिक्षकेतर पदांचे सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याची कार्यवाही सुरु आहे. दरम्यान बार असोसिएशन नागपूर यांनी मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे जनहित याचिका क्र.५७/२०१६ दाखल करुन राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर संचालित डॉ. बाबासाहेब आंबेडकर विधि महाविद्यालय संस्थेतील रिक्त असलेली शिक्षकीय व शिक्षकेत्तर पदे भरण्यात यावीत अशी मागणी केली. मा. न्यायालयाने सदरहू जनहित याचिका क्र.५७/२०१६ मध्ये दि.१०.१०.२०१८ रोजी सदरहू संस्थेतील रिक्त पदे भरण्याबाबत शासनाने विद्यापीठाशी विचारविनियम करुन योग्य तो निर्णय घेण्याबाबत आदेशीत केले. मा. न्यायालयाने उक्त नमूद जनहित याचिकेत दिलेल्या आदेशानुसार राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ संचालित डॉ. बाबासाहेब आंबेडकर विधि महाविद्यालय संस्थेतील रिक्त असलेली शिक्षकीय पदे भरण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ संचालित डॉ. बाबासाहेब आंबेडकर विधि महाविद्यालय संस्थेसाठी शासन मान्य मंजूर पदांपैकी रिक्त असलेली खाली नमूद केल्याप्रमाणे शिक्षकीय व शिक्षकेत्तर पदे भरण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **पदनाम** | **पदसंख्या** |
|---|---|---|
| | शिक्षकीय पदे | |
| १ | प्राध्यापक | ०१ |
| २ | सहायक प्राध्यापक | ०२ |
| | **एकूण पदे** | ०३ |
| | शिक्षकेतर पदे | |
| १ | अधीक्षक | ०१ |
| २ | निवडश्रेणी लिपिक | ०१ |
| | **एकूण पदे** | ०२ |

२. वरील तक्त्यात दर्शविलेली अनुक्रमे प्राध्यापक, सहयोगी प्राध्यापक व अधीक्षक, निवडश्रेणी लिपिक ही पदे भरताना सदरहू पदांसाठी विद्यापीठ अनुदान आयोग, राज्य शासनाने वेळावेळी विहित केलेली शैक्षणिक अर्हता, पात्रता, अनुभव तसेच राज्य शासनाचे भरतीसंदर्भातील प्रचलित नियम इ. बाबीं विचारात घेऊन विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन भरती प्रक्रियेची कार्यवाही होईल याची दक्षता घ्यावी.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६३६/१८ आपुक, दि.१५.११.२०१८ व अनौपचारिक संदर्भ क्र. ३८/आपुक, दि.१७.०१.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२१८१७२१०७१२०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Eknath Sable

Digitally signed by Vijay Eknath Sable
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad74dd20b49c8ab0bc83f54f3d9c91571a6cd47aeb9a9f05783d44cafe7a7d8e, serialNumber=ad8df0c87ab8e6c9f8574ab838dd4c466ebe81828f43e76bfa02129f8e862cd2, cn=Vijay Eknath Sable
Date: 2019.02.21 17:09:59 +05'30'

**(विजय साबळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. कुलगुरु, सर्व अकृषि विद्यापीठे,
४. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (५ प्रती)
६. महालेखापाल (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (५ प्रती)

७. सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
८. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण,
११. अधिदान व लेखा अधिकारी,नागपूर,
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१३. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई,
१५. वित्त विभाग, व्यय-५, आपुक, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती (विशि-१)